अपंग व्यक्ती ( समानसंधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण ) अधिनियम, १९९५ नुसार गट-क व गट-ड मधील पदावर शारीरीकदृष्टया अपंगासाठी आरक्षण ठेवणे व त्यानुसार अनुशेष भरणेबाबत...

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.१०५०/ई-७
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ०६ सप्टेंबर, २०१८.

वाचा :-

(१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.संकिर्ण-१०/२००४/प्र.क्र.२५२/ई-७, दि.१०.२.२०११.

(२) केंद्रीय सामाजिक न्याय व सक्षमीकरण मंत्रालय यांची शासन अधिसुचना क्र.१६-१५/२०१०-डीडी.III, दि.२९.७.२०१३.

(३) अपंग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ दि.२८.१२.२०१६

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.संकिर्ण-१०/२००४/प्र.क्र.२५२/ई-७, दि.१०.२.२०११ अन्वये “अंध/अल्पदृष्टी” कर्मचाऱ्यांना “मंडळ अधिकारी” पदावरील पदोन्नतीसाठी अपात्र ठरविण्यात आलेले आहे. दरम्यानच्या कालावधीत केंद्रीय सामाजिक न्याय व सक्षमीकरण मंत्रालयाव्दारे दि.२९.७.२०१३ च्या अधिसूचनेव्दारे अपंगांकरीता सुनिश्चित केलेल्या पदांची यादि प्रसिध्द केली असून सदर अधिसुचनेतील परि.५ खालील टिप क्र.३ मध्ये जर एखाद्या पदावर अपंग व्यक्ती कार्यरत असल्यास ते पद अपंगांसाठी सुनिश्चित असल्याचे तर टिप क्र.४ मध्ये जर एखादे पद अपंगांसाठी सुनिश्चित असल्यास त्या पदाच्या पदोन्नतीचे पद देखिल अपंगांच्या त्या प्रकाराकरीता सुनिश्चित असल्याचे स्पष्ट करण्यात आले आहे. तसेच अपंग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ दि.२८.१२.२०१६ अंतर्गतच्या कलम २०(३) नूसार कोणत्याही कर्मचाऱ्यास केवळ त्याच्या विकलांगतेमुळे पदोन्नती नाकारता येणार नसल्याची बाब स्पष्ट करण्यात आलेली आहे. सबब, “अंध/ अल्पदृष्टी” कर्मचाऱ्यांना “मंडळ अधिकारी” पदावरील पदोन्नतीसाठी अपात्र ठरविण्याची बाब ही अपंग व्यक्ती हक्क अधिनियमातील तरतुदींशी विसंगत असल्याने या विभागाच्या दि.१०.२.२०११ च्या शासन निर्णयासोबतच्या “परिशिष्ठ-अ” मध्ये सुधारणा करण्यात येत असून या आदेशाव्दारे “अंध/अल्पदृष्टी” कर्मचाऱ्यांना “मंडळ अधिकारी” पदावरील पदोन्नतीसाठी पात्र ठरविण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०९०६११३११२९५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2018.09.06 11:36:08 +05'30'

**(डॉ.संतोष भोगले)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
५. प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिलेट साईड), मुंबई
७. प्राथोनेटरी ॲन्ड सिनियर मास्टर, उच्च न्यायालय, मुंबई
८. प्रधान महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई
९. प्रधान महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा) नागपूर
१०.सर्व मंत्रालयीन विभाग
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४.आयुक्त, अपंग कल्याण, ३ चर्च रोड, पुणे
१५.सेवायोजन संचालनालय, मुंबई
१६.सर्व विभागीय आयुक्त
१७.सर्व जिल्हाधिकारी
१८. सामान्य प्रशासन विभाग (कार्या-१६अ), मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
१९.सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,/ सुधार-३
२०.महसूल व वन विभागातील सर्व आस्थापना कार्यासने
२१.निवडनस्ती ई-७ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.